**नलिका वितरण प्रणालीमुळे बचत होणाऱ्या पाण्याचे सुयोग्य नियोजन करण्यासाठी धोरण ठरविणे.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सिंचन २०२३ /प्र.क्र.११/२०२३/जसं (धोरण)**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १९.०४.२०२३

**प्रस्तावना :**

उपलब्ध पाण्याचा इष्टतम वापर करुन सुक्ष्म सिंचनास प्राधान्य देण्याचे शासनाचे धोरण आहे. बंदिस्त नलिका वितरण प्रणालिच्या वापरामुळे भूसंपादनाच्या खर्चात बचत होते. तसेच वहन व्ययाची बचत होऊन, पाणी चोरीस आळा बसतो. पारंपारिक कालवा प्रणालीमध्ये पाण्याचे होणारे बाष्पीभवन बंदिस्त नलिका वितरण प्रणालीत टाळले जाते. याअनुषंगाने दि.१३.०१.२०१७ व १८.०१.२०१७ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे बंदिस्त नलिका वितरण प्रणालीबाबतचे धोरण विहित करण्यात आले असून, दि.०२.०२.२०१७ रोजीच्या शासन परिपत्रकानुसार नलिकेद्वारे वितरण प्रणाली धोरणाबाबत निकष / मार्गदर्शक सूचना प्रसृत करण्यात आलेल्या आहेत. तसेच नलिकेद्वारे वितरण प्रणाली करिताची हस्तपुस्तिका देखील प्रसिध्द करण्यात आलेली आहे. याअनुषंगाने, जलसंपदा विभागाच्या अधिनस्त पाटबंधारे विकास महामंडळाकडून प्राप्त अहवालानुसार सद्य:स्थितीत नलिका वितरण प्रणालीच्या वापराद्वारे अंदाजित १,०१,२७६ हे क्षेत्र प्रत्यक्ष सिंचनाखाली आले आहे.

बंदिस्त नलिका वितरण प्रणालीबाबतच्या दि.०२.०२.२०१७ रोजीच्या परिपत्रकातील १.९ येथील तरतूद खालीलप्रमाणे आहे :

"राज्यातील सिंचन प्रकल्पांचे लाभक्षेत्र ठरवितांना लागवडी योग्य क्षेत्र (CCA) व नियोजित सिंचन क्षेत्र (ICA) या दोन संज्ञा विचारात घेतल्या जातात. सर्वसाधारण पणे CCA हा ICA च्या ७०% ते ८०% असतो. त्यामुळे उपलब्ध पाण्याच्या तुलनेत प्रत्यक्षात लाभक्षेत्रात लागवडीलायक क्षेत्र जास्त असते. या जास्तीच्या क्षेत्रास पाणी घेण्यास शेतक-यांना प्रतिबंध करणे शक्य नसते. तसेच जलाशयावरुन व कालव्यावरुन अनुज्ञेय मर्यादेत दिल्या जाणाऱ्या खाजगी उपसा क्षेत्राची तरतूद प्रकल्प संकल्पनात केलेली नसते. त्याच प्रमाणे वाढत्या नागरीकरणामुळे व औद्योगिकीकरणामुळे प्रकल्पिय तरतुदींच्या तुलनेत जास्तीचे पाणी बिगर सिंचन प्रयोजनार्थ वेळोवेळी वर्ग केले जाते. त्यामुळे राज्यातील बहुतेक प्रकल्पांच्या जलनियोजनावर व सिंचन व्यवस्थेवर मोठया प्रमाणावर ताण निर्माण झाला आहे. नलिका वितरणामुळे बचत झालेल्या पाण्यातून मुळ घोषित लाभक्षेत्रात निर्माण झालेली तुट भरुन काढणे आणि CCA व ICA मधील तफावत दुर करणे हा उद्देश असावा. मात्र नलिका वितरण प्रस्तावित करुन पाणी बचत दर्शवून प्रकल्पाच्या मंजुर लाभक्षेत्राबाहेरील वाढीव सिंचन क्षेत्र शासन पूर्व मान्यतेखेरीज प्रस्तावित करु नये."

**शासन निर्णय :-**

सदर तरतुदीनुसार नलिका वितरणामुळे बचत झालेल्या पाण्यातून लाभक्षेत्रामधीलच CCA मध्ये उर्वरित क्षेत्रास पाणी देणे अभिप्रेत आहे. तथापि सद्य:स्थितीत नलिका वितरणामुळे बचत झालेल्या पाण्यातून लाभ क्षेत्राबाहेर पाणी देण्याचे विविध प्रस्ताव प्राप्त होत आहेत. याकरिता धोरणात्मक निर्णय होणे आवश्यक आहे. याअनुषंगाने विचार विनिमय करुन नलिका वितरण प्रणालित धोरणात सुधारणा प्रस्तावित करणेसाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे :

२.१) **समितीची रचना :-**

| अ. क्र. | सदस्याचे नाव | पद |
|---|---|---|
| १. | श्री. संतोष तिरमनवार, कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद. | अध्यक्ष |
| २. | श्री. जयंत बोरकर, मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव. | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ३. | श्री. सुदर्शन पगार, मुख्य अभियंता, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक | सदस्य |
| ४. | श्री.हणमंत गुणाले, मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे. | सदस्य |
| ५. | श्री.अभय पाठक, मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती. | सदस्य |
| ६. | श्री. निलेश भोईर, अधीक्षक अभियंता, कोयना संकल्प चित्र मंडळ, पुणे. | सदस्य सचिव |

२.२) **समितीची कार्यकक्षा :**

१. नलिका वितरण प्रणालीमुळे बचत होणाऱ्या पाण्याचा विनियोग सुयोग्य पध्दतीने करण्यासाठी शासन निर्णय दि.०२.०२.२०१७ च्या मुद्दा क्र.१.९ मधील तरतूदींचा अभ्यास करुन शिफारस करणे.

२. उपरोक्त प्रमाणे शिफारस करतांना राज्य जलनिती, विविध अधिनियमातील तरतूदी, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाच्या मार्गदर्शक सूचना, लाभक्षेत्राबाहेर मागणी केलेल्या क्षेत्रास असणारी पाण्याची निकड इत्यादी बाबी विचारात घेण्यात याव्यात.

२.३) **समितीचा कालावधी :** उपरोक्त २.२ मध्ये नमूद कार्यवाही सदर शासन निर्णय प्रसृत झाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या कालावधीत पूर्ण करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०२३०४२४१४०२०८८२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=69D010EE03D01B7C859C5458FEEAF66B1EAE16BC67F5CCB127AE66608DE5FA48, cn=NAMITA GAURAV BASER
Date: 2023.04.24 14:07:45 +05'30'

**( न. गौ. बसेर )**
शासनाच्या उप सचिव

**प्रत :**

१) मा.राज्यपालांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
३) मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
४) मा. राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
५) अप्पर मुख्य सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
६) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
७) सचिव (प्रकल्प समन्वय) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळ
९) महालेखापाल -१ व २ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा) महाराष्ट्र, मुंबई व नागपूर,
१०) आंतरवित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग
१०) अध्यक्ष, सर्व समिती सदस्य व सदस्य सचिव
११) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,
१२) सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग
१३) जसं (धोरण) कार्यासन संग्रहार्थ.